मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्याकरिता Innova Crysta ZXMT ७ STR या मॉडेलचे नवीन वाहन खरेदीस मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक: संकीर्ण-२०२५/प्र.क्र.०७/नोंदणी शाखा,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक: ५ मार्च, २०२५**

संदर्भः- १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक वाहन-२००८/ (५९/०८)/नोंदणी शाखा, दिनांक- ७ डिसेंबर, २०१२.
२) पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, शासन निर्णय क्र. मइवाधो-२०२१/प्र.क्र. २५/तां.क.४, दिनांक २३ जुलै, २०२१.
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.वाहन२०२१/ प्र.क्र.२२/२०२१/विनियम, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२२.
४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.वाहन२०२४/ प्र.क्र.११/विनियम, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन दि.७ डिसेंबर, २०१२ च्या शासन निर्णयान्वये शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या खालील नमूद ५ पदांना ५ वाहने व १ स्टाफ कार अनुज्ञेय करण्यास राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने मान्यता दिलेली आहे.

| अ.क्र. | पदनाम | एकूण वाहने |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री (शालेय शिक्षण) | १ |
| २ | मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) | १ |
| ३ | मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) | १ |
| ४ | मा. राज्यमंत्री (क्रीडा) | १ |
| ५ | मा. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) | १ |
| ६ | स्टाफ कार (कार्यालयीन वापराकरिता) | १ |

सद्यस्थितीत, मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांना कार्यालयीन वापराकरिता शासकीय वाहन उपलब्ध करून देणे आवश्यक असल्याने, त्यांचेकरीता नवीन वाहन खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांच्या कार्यालयीन वापराकरिता रुपये रु.२९,४७,७१८/- (अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष सत्तेचाळीस हजार सातशे अठरा मात्र) इतक्या किंमतीचे (वाहनाची किंमत वस्तू व सेवा कर टेंपररी रजिस्ट्रेशन चार्जेस सहाय्यभूत साहित्य (Accessories) " Innova Crysta ZX MT ७ STR " हे नवीन वाहन "मे. वाय.एम मोटर्स. प्रा.लि. पुणे " या कंपनीकडून खरेदी करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त वाहनाच्या खरेदीसाठी होणारा खर्च, “मागणी क्र.ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२, विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१) विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१) (०१) राष्ट्रीय छात्र सेना (दत्तमत)(२२०४००१६) -१३, कार्यालयीन खर्च” या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. विभागाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी वाहन खरेदीची उपरोक्त रक्कम रुपये २९,४७,७१८/- (अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष सत्तेचाळीस हजार सातशे अठरा मात्र) "मे.वाय.एम.मोटर्स.प्रा.लि. पुणे " यांना ऑनलाईन पेमेंट सिस्टीमव्दारे/विहित मार्गाने अदा करावी.

४. हे आदेश, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२ दिनांक १७/४/२०१५ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला उपविभाग दोन, अनुक्रमांक १९ ब, नियम ६९ नुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४१/२०२५/विनियम, दिनांक २४.०१.२०२५ व वित्त विभाग अनौपचारिक सं.क्र.२८०/व्यय-५, दिनांक २५.०२.२०२५ तसेच पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १३१/तां.क.४, दिनांक ०३.०२.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार व राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३०५१६२१०६९४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT., 2.5.4.20=57b66327fd02392673b4ab4d6a85fdd38e27f3be70b7a6bddc9bea3f08d2330b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF01D0AB2AFFB124678E1A586450069BBD9E2CBC928A89E57C1B37706CB9F428, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2025.03.05 16:22:29 +05'30'

(समीर सावंत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग), मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक
३. उपसचिव, वित्त विभाग (व्यय-५/विनियम), मंत्रालय, मुंबई-३२
४. कक्ष अधिकारी (लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. YM Motors Private Limited, Plot No.२७, T Block, Telco Road, MIDC Bhosari, Balaji Nagar Chowk, Pune-४११०२६
९. निवडनस्ती (नोंदणी शाखा)